पालघर जिल्ह्यातील वाडा, मोखाडा व जव्हार तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग रस्त्याची प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२३/प्र.क्र.५५/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक-२८ जून, २०२३.

**पहावे** :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(को)/रेखाचित्र शाखा/दर्जोन्नती-१७२/३८९७, दिनांक २४/११/२०२२.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांनी संदर्भाधिन पत्रान्वये पालघर जिल्ह्यातील वाडा तालुक्यातील इतर जिल्हा मार्ग, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांनी सदर रस्ते दर्जोन्नत करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्यांवरील वाहतुक वर्दळ व गावांची संख्या, लोकसंख्या, रस्त्याचा होणारा वापर तसेच प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी ,जिल्हा परिषद, पालघर यांची मागणी विचारात घेता सदर रस्ते प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण यांचा प्रस्ताव व प्रशासक तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर यांची मागणी विचारात घेऊन पालघर जिल्ह्यातील वाडा, तालुक्यातील खालील इतर जिल्हा मार्ग, प्रमुख जिल्हा मार्ग म्हणून दर्जोन्नत करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | प्रस्तावित रस्त्याचे नांव | सामाविष्ठ रस्त्याचा क्रमांक | साखळी क्रमांक व लांबी | दर्जोन्नत करावयाची एकूण लांबी (कि.मी.) | दर्जोन्नती नंतरचा क्रमांक |
|---|---|---|---|---|---|
| १. | प्रजिमा-४३ गौरापुर, बुधावली, बिळवली, चिंचघर, कुडुस, कोठेळा, वरनाळा खैरे रस्ता. | इतर जिल्हा मार्ग-९८ | ०/०० ते २५/०० (२५.०० कि.मी.) | २५.०० कि.मी. | प्रमुख जिल्हा मार्ग- १२० |
| | **एकूण** | | | **२५.०० कि.मी.** | |

परिणामी, सदर रस्त्यांची लांबी विचारात घेता रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील पालघर जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **२५.०० कि.मी. ने वाढ** होवून एकूण लांबी (१३६६.८१० + २५.०० ) म्हणजेच **१३९१.८१० कि.मी.** इतकी व इतर जिल्हा मार्ग रस्त्यांच्या एकूण लांबीत २५.०० कि.मी. ने घट होवून एकूण लांबी (३१.६० ०- २५.००) म्हणजेच **६.६०० कि. मी.** इतकी होईल.

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या (www.maharashtra.gov.in) या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०६३०१५५२३९०४१८ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANPAT SANDIPAN KACHARE

Digitally signed by GANPAT SANDIPAN KACHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3021bf955fefd71ffad5dd7c97769147f19aca6383a12fed6cff4849d78e224a, pseudonym=44879507A55BADCE1C62B2D52FC25354CE085DFF, serialNumber=B5B30AEBA818C77E43E7B8BA4BCA0E9F0D137FEAB0BBCB16CACF2D44087E8A76, cn=GANPAT SANDIPAN KACHARE
Date: 2023.06.30 15:53:24 +05'30'

**( ग. सं. कचरे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोंकण.

२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोंकण. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

३) अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, ठाणे. (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करुन जिल्ह्याच्या संकेतस्थळी प्रसिध्द करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)

**प्रत :-**

१) उप सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन.मुंबई ,फोर्ट ,मर्झबान पथ,

२) जिल्हाधिकारी, पालघर.

३) मुख्य कार्यकारी अधिकारी, पालघर जिल्हा परिषद, पालघर.

४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, जव्हार, जि. पालघर.

५) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

६) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.

७) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

८) निवडनस्ती.